"माध्यमिक शालांत परिक्षापूर्व तांत्रिक/व्यवसायिक शिक्षणाच्या सुविधांचा विकास करणे" या चालू जिल्हास्तरीय सर्वसाधारण योजनेला नव्याने प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
उच्च व तंत्र शिक्षण विभाग,
शासन निर्णय क्रमांक जिवायो-२०१०/(३३२/ १०)-व्यशि-२ (अर्थसं)
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- १२ नोव्हेंबर, २०१०

संदर्भ :- १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्रमांक जिवायो-१००७/प्र.क्र.३९/का-१४४४, दिनांक १६ फेब्रुवारी, २००८

२) नियोजन विभागाचे पत्र क्रमांक जिवायो-२०१०/प्र.क्र.९७/का.१४८१, दिनांक २० मे, २०१०

३) प्र.संचालक (व्यवसाय शिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई -०१ यांचे पत्र क्रमांक ६/नियोजन/जि.यो./यो.प्र.मा./१४६, दिनांक २०ऑक्टोंबर, २०१०

**प्रस्तावना** :- सन १९८६ च्या नविन शैक्षणिक धोरणाप्रमाणे (New Education Policy, १९८६) माध्यमिक स्तरावरील शिक्षणात कार्यानुभव विषय शिकविण्यावर भर देण्यांत आला होता जेणेकरून विद्यार्थी भावी आयुष्यात "वर्ल्ड ऑफ वर्क" साठी तयार होवू शकतील. राज्यशासनाने अनेक वर्षापासून माध्यमिक शालांत स्तरावर कार्यानुभव विषयाला पर्याय म्हणून कौशल्यावर आधारीत उपयुक्त असे व्यवसायिक अभ्यासक्रम उपलब्ध करून दिले आहेत. सदर अभ्यासक्रमात विद्यार्थ्यांना मुलभूत तंत्रज्ञानाची ओळख (V१), यंत्र अभियांत्रिकी (V२), विद्युत व इलेक्ट्रॉनिक्स अभियांत्रिकी (V३) या विषयातील मुलभूत तत्वे व कौशल्ये आत्मसात करता येतात. यामुळे विद्यार्थ्यांत व्यवसाय शिक्षणाची आवड निर्माण होवून त्यांना त्या कौशल्यांचा दैनंदिन जीवनात उपयोग करता येतो. तसेच आवश्यकतेनुसार सदर कौशल्याची व्याप्ती वाढविण्यासाठी विद्यार्थी अभियांत्रिकी क्षेत्रातील उच्च शिक्षणाकडे वळू शकतो अथवा आपल्या आवडीप्रमाणे रोजगार/स्वयंरोजगार निवडू शकतो. माध्यमिक स्तरावर कार्यानुभव विषयाऐवजी उपलब्ध तीन विषयांपैकी एक विषय ऐच्छिक विषय म्हणून निवडता येतो. ८ वी, ९वी व १० वी इयत्तांमध्ये उपरोक्त विषयांपैकी एक पूर्व व्यवसायिक अभ्यासक्रम शिकविला जातो. या अभ्यासक्रमामध्ये व्ही-१- इंट्रोडक्शन ऑफ बेसिक टेक्नॉलॉजी, व्ही-२- एलिमेंटस् ऑफ मेकॅनिकल टेक्नॉलॉजी , व्ही-३ एलिमेंटस् ऑफ इलेक्ट्रिकल ॲण्ड इलेक्ट्रॉनिक्स टेक्नॉलॉजी हे अभ्यासक्रम समाविष्ट आहेत. सद्यस्थितीत राज्यामध्ये १५६ शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्रे प्रत्यक्षात कार्यरत आहेत. प्रत्येक संस्थेची किमान विद्यार्थी क्षमता १२० (इयत्ता ८ वी ) असून, १५६ संस्थांची एकूण विद्यार्थी प्रवेश क्षमता २३५८० (इयत्ता ८ वी) इतकी आहे.

सदर संस्थांना तांत्रिक/व्यवसाय शिक्षण अभ्यासक्रमासाठी आवश्यक असलेली यंत्रसामुग्री, साधनसामग्री, हत्यारे, उपकरणे,फर्निचर इत्यादीं बाबींसाठी आवश्यक असलेला निधी "माध्यमिक शालांत परिक्षापूर्व तांत्रिक/व्यवसायिक शिक्षणाच्या सुविधांचा विकास करणे" या चालू जिल्हास्तरीय सर्वसाधारण योजनेद्वारे उपलब्ध करून देण्यांत येत आहे. मात्र सदर योजनेसंदर्भातील प्रशासकीय मान्यतेचा शासन निर्णय उपलब्ध होत नसल्याने, या चालू असलेल्या जिल्हास्तरीय सर्वसाधारण योजनेस नव्याने प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाचे विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :- "माध्यमिक शालांत परिक्षापूर्व तांत्रिक/व्यवसायिक शिक्षणाच्या सुविधांचा विकास करणे" हया चालू जिल्हास्तरीय सर्वसाधारण योजनेस या शासन निर्णयान्वये नव्याने प्रशासकीय मान्यता देण्यांत येत आहे.

"माध्यमिक शालांत परिक्षापूर्व तांत्रिक/व्यवसायिक शिक्षणाच्या सुविधांचा विकास करणे" हया योजनेद्वारे उपलब्ध होणारा निधी खालील बाबींकरीता खर्च करण्यांत यावा.

१. विद्यमान शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्रांमधील तसेच नव्याने निर्माण करण्यांत येणाऱ्या शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्रांमधील पूर्व व्यवसाय अभ्यासक्रमांसाठी विहित केलेल्या मानकानुसार आवश्यक असलेली यंत्रसामग्री, साधनसामग्री, हत्यारे, उपकरणे, फर्निचर इत्यादींची खरेदी व दुरूस्ती, देखभाल व आधुनिकीकरण.

२. प्रयोगशाळा, कार्यशाळा व ग्रंथालय विकास, व त्यांचे आधुनिकीकरण. वाय-फाय कॅम्पस उभारणी व आधुनिकीकरण.

३. संगणक व संवाद प्रयोगशाळा उभारणी व विकास.

४. दृकश्राव्य साधने, शैक्षणिक साहित्य यांची निर्मिती, विकास यांचे अनुषंगाने खरेदी.

५. नविन मशिन फाऊंडेशन व मशिन वायरींग, Electrical Layout व दुरूस्ती.

२. सदर योजना जिल्हास्तरीय योजना असल्यानें, संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांनी नियोजन विभागाकडून वेळोवेळी निर्गमित होणाऱ्या मार्गदर्शक सूचनेनुसार जिल्हा नियोजन समितीकडे नियतव्ययाची मागणी करण्यांत यावी. तसेच निधी अर्थसंकल्पीत होणे तसेच खर्चाबाबत पाठपुरावा करण्याची जबाबदारी संचालक (व्यवसाय शिक्षण), संबंधित सहसंचालक, प्रादेशिक विभाग व संबंधित जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांची राहील. या शासन निर्णयान्वये प्रस्तूत योजनेसाठी संबंधित जिल्हयाचे जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी यांना जिल्हा नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यांत येत आहे.

३. या योजनेद्वारे उपलब्ध निधीतून करण्यांत येणाऱ्या यंत्रसामग्री, साधनसामग्री,फर्निचर,हत्यारे, उपकरणे व इतर अनुषांगिक बाबींच्या खरेदीस तांत्रिक मान्यता संचालक (व्यवसाय शिक्षण) यांनी देणे आवश्यक राहील.

४. या योजनेची अंमलबजावणी ही दिनांक १६ फेब्रुवारी, २००८ च्या नियोजन विभागाच्या शासन निर्णयामधील मार्गदर्शक सूचनेनुसार व शासन पत्र क्रमांक संकीर्ण-२००८(४०५/०८)/व्यशि-२, दिनांक २३ जानेवारी, २००९ अनुसार तसेच शासनाने वेळोवळी या संदर्भात निर्गमित केलेल्या व भविष्यात निर्गमित करण्यांत येणाऱ्या मार्गदर्शक सूचनेनुसार करण्यांत यावी.

५. "माध्यमिक शालांत परिक्षापूर्व तांत्रिक/व्यवसायिक शिक्षणाच्या सुविधांचा विकास करणे" ही योजना जिल्हास्तरीय योजना असल्याने संबंधित जिल्हयाच्या मागणी क्रमांका अंतर्गत प्रधान लेखाशिर्ष २२०३ तंत्र शिक्षण खाली नियतव्ययाची मागणी जिल्हा नियोजन समितीकडे करण्यांत यांवी. तसेच निधी अर्थसंकल्पीत होईल याची दक्षता घ्यावी.

६. हा शासन निर्णय नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक २०५/१४८१, दिनांक २६ ऑक्टोंबर, २०१०अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार तसेच वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक विअप्र-१०.०८/प्र.क्र. ७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ अन्वये सुधारीत करण्यांत आलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग पहिला, उप विभाग तीन, अनुक्रमांक ४, नियम क्रमांक २७(२) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदरहू शासन निर्णय हा शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध असून, त्याचा संगणक साकेतांक क्रमांक २०१०११०९१८०४०८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(सं.अ.बागेश्वर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति.

(१) प्र.संचालक, व्यवसाय शिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, म.रा. मुंबई १.
(२) सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई / पुणे / नाशिक / औरंगाबाद / अमरावती / नागपूर. (संचालनालयामार्फत)
(३) जिल्हाधिकारी तथा सदस्य सचिव, जिल्हा नियोजन समिती ----------- (संचालनालयामार्फत)
(४) जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालये (संचालनालयामार्फत)
(५) मुख्याध्यापक, शासकीय तंत्र माध्यमिक शाळा/केंद्रे (संचालनालयामार्फत)
(६) नियोजन विभाग, मंत्रालय (का.क्र.१४७१/१४८१)
(७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
(८) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, कार्यासन क्रमांक साशि-१ व व्यशि-४
(९) निवड नस्ती (व्यशि-२)

D:\S.A.BAGESHWAR\GR\Scheme GR 2203\Pre SSC.doc